मराठी चित्रपटांना अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी
चित्रपट परिक्षण समितीची पुनर्रचना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५ / प्र.क्र. ७७ /सां.का.१**
मंत्रालय (विस्तार) भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ६ मे, २०१५.

**वाचा :** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१२/प्र.क्र.४६/सां.का.१, दि.३०.०१.२०१४.

**प्रस्तावना :**

शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या मराठी चित्रपटांना अर्थसहाय्याच्या योजनेकरीता दि.३०.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये चित्रपट परिक्षण समितीची पुनर्रचना करण्यात आली होती. ही समिती रद्द करुन नवीन समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शासन निर्णय दि.३०.०१.२०१४ अन्वये मराठी चित्रपटांना अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी चित्रपट परिक्षण करुन दर्जा निश्चित करण्याकरीता व अर्थसहाय्याची शिफारस करण्यासाठी गठीत करण्यात आलेली चित्रपट परिक्षण समिती रद्द करुन संपूर्ण समितीची पुनर्रचना करण्यात येत आहे. या समितीवर शासनाने नव्याने नेमलेल्या सदस्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत :

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १ | श्री. सुरेश देशमाने | सदस्य |
| २ | श्री. व्ही.एन.मयेकर | सदस्य |
| ३ | श्री. अशोक पत्की | सदस्य |
| ४ | श्री. सुनिल मांजरेकर | सदस्य |
| ५ | श्रीमती उषा नाईक | सदस्य |
| ६ | श्रीमती सोनाली कुलकर्णी | सदस्य |
| ७ | श्रीमती रोहिणी निनावे | सदस्य |
| ८ | श्री. मंगेश कुलकर्णी | सदस्य |
| ९ | श्री. पुरुषोत्तम लेले | सदस्य |
| १० | श्रीमती किशोरी अंबिये | सदस्य |

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| ११ | श्री. हेमंत एदलाबादकर | सदस्य |
| १२ | श्री. उज्ज्वल निरगुडकर | सदस्य |
| १३ | श्री. प्रमोद पवार | सदस्य |
| १४ | श्री. संजय पवार | सदस्य |
| १५ | श्री. रवि जाधव | सदस्य |
| १६ | श्री. महेश नाईक | सदस्य |
| १७ | श्री. नागेश सुर्वे | सदस्य |
| १८ | श्रीमती मधुरा वेलणकर साटम | सदस्य |
| १९ | श्री. श्याम सोनाळकर | सदस्य |
| २० | अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळ, मुंबई | सदस्य |

सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई. हे या समितीचे सदस्य सचिव म्हणून काम पहातील.

२. शासनातर्फे राबविण्यात येणाऱ्या मराठी चित्रपटांना अर्थसहाय्य योजनांनुसार चित्रपटांचे परिक्षण करुन अर्थसहाय्याकरीता पात्रतेसाठी शिफारस करण्याकरीता गठीत करण्यात आलेली चित्रपट परिक्षण समिती दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांचे अधिनस्त कार्यरत राहील. या समितीचा कार्यकाल शासन निर्णयाच्या दिनांकापासून तीन वर्षाचा असेल. सदर कार्यकाल संपल्यानंतर शासनाकडून समितीची पुनर्रचना करण्यात येईल.

**३.** चित्रपट परिक्षणाकरीता ३३ टक्के सदस्यांची उपस्थिती आवश्यक राहील. समिती सदस्यांनी केलेल्या शिफारसींवर योजनेनुसार पुढील कार्यवाही व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांचेकडुन करण्यात येईल.

**४.** या समितीवरील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित नियमानुसार प्रवास भत्ता, बैठक भत्ता व मानधन अनुज्ञेय राहील. यासाठी होणारा खर्च दादासाहेब फाळके चित्रनगरी महामंडळ, गोरेगाव, मुंबई यांनी त्यांना योजनेंतर्गत मिळणाऱ्या सेवाशुल्कातून भागवावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१९१२०५५२७३२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Pandurang Bhokare

Digitally signed by Sanjay Pandurang Bhokare
DN: CN = Sanjay Pandurang Bhokare, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = TOURISM AND CULTURAL AFFAIRS
Date: 2015.05.19 12:09:42 +05'30'

**( संजय पां. भोकरे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव (पूर्व), मुंबई - ४०० ०६५.
२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई.
३) अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळ, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ मुंबई, महाराष्ट्र.
५) महालेखापाल (लेखा परीक्षा) १ मुंबई, महाराष्ट्र.
६) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव.
७) चित्रपट परिक्षण समितीचे सर्व सदस्य, द्वारा - दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगांव (पूर्व), मुंबई - ४०० ०६५.
८) निवड नस्ती, सां.का.१